महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई
या कार्यालयास सन २०१४-१५ या आर्थिक
वर्षासाठी अनुदान वितरीत करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## अल्पसंख्याक विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः उसाअ-२०१३/प्र.क्र.२९/उसाअ/का.४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
तारीख: ७ जानेवारी, २०१५

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.१ जुलै,२०१४
२) शासन निर्णय , अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांकः उसाअ-२०१३/ प्रक्र.३५/ उसाअ/का-४, दि.२६.८.२०१४
३) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांकः उसाअ-२०१३/ प्रक्र.३५/ उसाअ/ का- ४, दि.३१.१०.२०१४

**प्रस्तावना -**

राज्यात उर्दू भाषेचा विकास, संवर्धन, प्रगती तसेच उर्दू व मराठी भाषेतील साहित्यिकांमध्ये वैचारीक आदान प्रदान होऊन राष्ट्रीय एकात्मतेची भावना दृढ व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीची स्थापना करण्यात आली आहे. महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत विविध कार्यक्रम राबविण्यासाठी वरील संदर्भ क्र.२ व ३ येथील शासन निर्णयान्वये एकूण रु.९० लाख इतके योजनांतर्गत अनुदान खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदानित करण्यात आलेली आहे. सदर अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या अनुदानापैकी ६० टक्के इतक्या मर्यादेपर्यंत अनुदान वितरीत करण्यास वरील संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर बाब विचारात घेता, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीला विविध कार्यक्रम राबविण्याकरिता सन २०१४-१५ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या रु.९०,००,०००/- (रुपये नव्वद लाख फक्त ) अनुदानापैकी ६०% टक्के रकमेच्या मर्यादेत रु.५४,००,०००/- (रु.चौपन्न लाख फक्त) इतके योजनांतर्गत अनुदान महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबईचा खर्च विहित मर्यादेत राहील याची त्यांनी दक्षता घ्यावी.

सदर रकमेचा ईसीएस (E.C.S.) अवर सचिव(१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नावाने काढण्यात यावा.

उपरोक्त खर्च "मागणी क्र.झेडई-०१, २२३५,सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम ०१- अल्पसंख्याकांना सहाय्य, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२३) महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीच्या विविध योजनांसाठी सहाय्यक अनुदान राज्य योजनेअंतर्गत योजना (२२३५ बी ०९४) ३१ सहाय्यक अनुदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई यांनी सदर खर्चाचे तपशील व निधीचे विनियोगाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत सादर करणे अनिवार्य राहील.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ. क्र.अनौसं-३८७/ का.१४७५, दि.२९.१२.२०१४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौसं-३/१५/व्यय-४, दि.३.१.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mdd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०७१५०७१०४४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anees Iqbal Ismail Shaikh

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MDD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2015.01.07 16:32:26 +05'30'

**( अनिस शेख )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मुख्य सचिव ,महाराष्ट्र शासन,
२) महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर
३) संचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) अवर सचिव (का.१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) खाजगी सचिव, मा.मंत्री, अल्पसंख्याक विकास, मंत्रालय, मुंबई.
८) कार्याध्यक्ष, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई (अकादमीच्या कार्यालयामार्फत )
९) कक्ष अधिकारी (का.४), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,